**कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कला महाविद्यालयातील अधिष्ठाता (गट-अ) /प्रबधंक /परिक्षा नियत्रंक गट-ब या संवर्गातील सन २०१८ मधील बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक: अेडीआर २७१२/प्र.क्र.६०/१८ /तांशि-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ जून, २०१८.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४)मध्ये विहित केलेल्या तरतूदीनुसार कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या, अधिष्ठाता गट-अ व प्रबंधक/परिक्षा नियंत्रक (गट-ब) यांची विनंती व प्रशासकीय कारणास्तव मुदतपुर्व बदली करण्यात येत आहे.

**अधिष्ठाता (गट-अ),**

| अ. क्र. | नांव व पदनाम | सध्या कार्यरत संस्थेचे नाव व ठिकाण | प्रस्तावित बदलीच्या संस्थेचे नाव व ठिकाण | बदलीचा प्रकार प्रशासकीय/ विनंती |
|---|---|---|---|---|
| १. | प्रा. र. सु. वडजे, अधिष्ठाता (गट-अ) | शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर | शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद | विनंती |

**प्रबंधक/परिक्षा नियंत्रक/स्वीय सहायक, गट-ब (प्रशा)**

| अ. क्र. | नांव व पदनाम | सध्या कार्यरत संस्थेचे नाव व ठिकाण | प्रस्तावित बदलीच्या संस्थेचे नाव व ठिकाण | बदलीचा प्रकार प्रशासकीय/ विनंती |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.ना.म.वाघमोडे, प्रबंधक, | सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | परीक्षा नियंत्रक,कला संचालनालय,मुंबई | प्रशासकीय |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

(१) हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

(२) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक यांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेतून तात्काळ त्यांची बदलीनंतरची पदस्थापना केलेल्या संस्थेत रुजू व्हावे. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी पर्यायी अधिष्ठाता/ प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक यांना दि. ३०.०६.२०१८ पर्यंत कोणत्याही परिस्थितीत कार्यमुक्त करावे.

(३) बदली झालेले अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक त्यांच्या संबंधीत संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित संस्थेच्या अधिष्ठातांना जबाबदार धरण्यात येईल.

(४) पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. सदर बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिष्ठाता/प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिष्ठाता/ प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

(५) बदली झालेल्या अधिष्ठाता/प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक यांची कोणतीही रजा प्रशासकीय विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

(६) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्याने बदली झालेल्या अधिष्ठाता/प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा जास्तीत जास्त **दि. ३०.०६.२०१८** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या आस्थापनेवर काढावेत. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या आस्थापनेकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक बदलीच्या संस्थेत रूजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या आस्थापनेने काढावे. दि.१ जुलै, २०१८पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या आस्थापनेतील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

(७) प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या अधिष्ठाता/प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल. बदली झालेल्या अधिष्ठाता/प्रबंधक/ परिक्षा नियंत्रक बदलीच्या जागी तात्काळ रूजू व्हावे. सदर अधिष्ठाता/प्रबंधक/परिक्षा नियंत्रक यांचा रूजू अहवाल संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०६१८१७०९२२१००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2018.06.18 17:09:19 +05'30'

(स.ल.ढेरे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.अपर मुख्य सचिव,(उच्च व तंत्रशिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) प्र.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्र.अधिष्ठाता, शासकीय चित्रकला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर/ शासकीय कला व महाविद्यालय, औरंगाबाद.
७) अधिष्ठाता, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) /मुंबई /नागपूर.
९) संबंधित अधिष्ठाता/प्रबंधक (कला संचालनालयामार्फत)
१०) निवड नस्ती, तांशि-६.